**महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीकडून राबविण्यात येणाऱ्या विविध प्रकल्प/कार्यक्रमांच्या अंमलबजावणीकरिता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील विविध योजनांच्या खर्चासाठी प्रशासकीय मान्यता**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक उसाअ-२०१६/प्र.क्र.४५/उसाअ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २ डिसेंबर, २०१६

**वाचा -**

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.इयुए-१०७५/एल-जेजे, दि.१६/०४/१९७५.
२) शासन निर्णय अल्पसंख्यांक विकास विभाग क्र.उसाअ २०१६/प्र.क्र.६ (सुधा.१) /का-४, दि.०५/१०/२०१६
३) शासन परिपत्रक अल्पसंख्यांक विकास विभाग, क्र. बीयुडी-२०१५/प्र. क्र.४३/ (भाग-१)/का.७, दि.२०/०४/२०१६.

**प्रस्तावना -**

राज्यामध्ये उर्दू भाषेचा विकास, भाषेचे संवर्धन, प्रगती तसेच उर्दू व मराठी भाषेतील साहित्यिकांमध्ये वैचारिक आदान प्रदान होऊन राष्ट्रीय एकात्मतेची भावना दृढ व्हावी. या उद्देशाने उपरोक्त अ.क्र.(१) येथील आदेशान्वये महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीची कार्ये निश्चित करण्यात येवून महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीची स्थापना सन १९७५ मध्ये करण्यात आली. अकादमीमार्फत उर्दू भाषेचे ज्ञान नसणाऱ्यांसाठी उर्दू भाषा वर्ग सुरु करणे, उर्दू साहित्यासाठी पारितोषिके देणे, उर्दू त्रैमासिक प्रकाशने इत्यादी विविध कार्यक्रम महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीकडून राबविण्यात येतात.

२. उर्दू साहित्य अकादमीकडून राबविण्यात येणारे विविध प्रकल्प/कार्यक्रमांची अंमलबजावणी पुर्ण क्षमतेने योजनाबध्दरित्या करणे व त्याकरिता पर्याप्त निधी उपलब्ध करुन देण्याकरीता उर्दू अकादमीच्या कार्यक्रम/प्रकल्प/योजनांकरीता योजनाअंतर्गत/ योजनेत्तर लेखाशिर्षाखाली आर्थिक तरतूद करण्यात आली आहे. विभागाच्या उपरोक्त संदर्भीय अ.क्र. (२) येथील दि.०५/१०/२०१६ च्या आदेशान्वये विविध उद्दिष्टे व त्यासाठी खर्च करण्याकरिता योजनांचे पुर्नविलोकन करुन खर्चाच्या रक्कमेत वाढ करण्यात आली आहे. तथापि सन २०१६-१७ करिता उपलब्ध रक्कमेमधून सदर कार्यक्रम निश्चित करावयाचा आहे. सबब, सन २०१६-१७ करीता योजनांअंतर्गत खर्चाकरिता मंजूर रु.०१.०० कोटी पैकी रु.८०.०० लाख इतक्या रक्कमेची तरतूद करण्यात आली आहे. उपरोक्त सदंर्भ क्र.(३) येथील परिपत्रकान्वये सन २०१६-१७ या वर्षाकरीता प्रथम ९ महिन्याकरिता (डिसेंबर, २०१६ अखेर) अर्थसंकल्पीय निधीचे वितरण करण्यात आले आहे. त्यानुसार २२३५ ब ०९४ या लेखाशिर्षाखाली र.८०.०० लाख इतका निधी उपलब्ध करण्यात आला आहे. त्यास अनुसरुन महाराष्ट्र राज्य साहित्य अर्दू अकादमीमार्फत राबविण्यात येणाऱ्या वार्षिक कार्यक्रमांच्या खर्चास लेखाशिर्ष “मागणी क्र. झेडई- ०१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२, समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम ०१, अल्पसंख्यांकांना सहाय्य, अनुदान ०६ राज्य योजनेअंतर्गत योजना (०१) (२३) महाराष्ट्र राज्य, उर्दू साहित्य अकादमीचे विविध योजनेसाठी सहायक अनुदान राज्य योजनांअंतर्गत योजना (२२३५ बी ०९४) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय –</u>**

१) महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात खर्चाच्या खालील बाबीस त्यापूढील रकान्यात नमूद केलेल्या रक्कमेच्या मर्यादित रु.८०.०० लाख (रुपये ऐंशी लाख फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास शासन प्रशासकीय मान्यता देत आहे.

| अ. क्र. (१) | उद्दिष्टे / योजना (२) | रक्कम (रुपये) (३) | सन २०१६-१७ या वर्षाकरिता मंजुर ८० % च्या मर्यादेत प्रस्तावित रक्कम (४) |
|---|---|---|---|
| १ | इमकान या त्रैमासिकाचे प्रकाशन. | रु.४,००,०००/- | ३,००,०००/- |
| २ | उर्दुमुशायरा आयोजित करणे | रु.२०,००,०००/- | १२,००,०००/- |
| ३ | राज्यस्तरीय जिल्हास्तरीय कार्यशाळा /सेमिनार व उर्दू-मराठी संमेलन आयोजित करणे. | रु.६,००,०००/- | ४,८०,०००/- |
| ४ | उर्दू भाषा कार्यक्रम आयोजित करण्यासाठी उर्दू शाळा महाविद्यालयांना व ज्या महाविद्यालयांत उर्दू भाषा शिकविली जाते अशा महाविद्यालयांना अनुदान मंजूर करणे. | रु.६,००,०००/- | ४,८०,०००/- |
| ५ | उर्दू ग्रंथालयांना नियतकालिके व पुस्तके पुरविणे. | रु. १०,००,०००/- | १०,००,०००/- |
| ६ | उर्दू नाटय महोत्सव आयोजित करणे. | रु.१५,००,०००/- | १२,००,०००/- |
| ७ | उर्दू नाटय कार्यशाळेचे आयोजन करणे. | रु.५,००,०००/- | ३,८०,०००/- |
| ८ | उर्दू हस्तलिखिताचे प्रकाशन तसेच मराठी-उर्दू अनुवादकांना आर्थिक अनुदान देणे. | रु.६,००,०००/- | ४,८०,०००/- |
| ९ | उर्दू भाषेतील कवी / लेखक / विचारवंत यांच्या पुस्तकांना पारितोषिके देणे. | रु.६,००,०००/- | ४,८०,०००/- |

| | | | |
|---|---|---|---|
| १० | १० वी, १२ वी, पदवी व पदव्युत्तर परीक्षांमध्ये उर्दू विषयांत पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या क्रमांकाचे गुण प्राप्त करणाऱ्या विद्यार्थ्यांना पारितोषिक देणे. | रु.६,००,०००/- | ४,८०,०००/- |
| ११ | उर्दू पत्रकारांसाठी दरवर्षी कार्यशाळेचे आयोजन करणे. | रु.२,००,०००/- | १,२०,०००/- |
| १२ | उर्दू भाषेमधील उल्लेखनीय कामगिरी बद्दल पारितोषिके देण्याबाबत. | रु.१४,००,०००/- | १४,००,०००/- |

२) सदहू रक्कम मागणी क्र. "मागणी क्र. झेडई- ०१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२, समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम ०१, अल्पसंख्याकांना सहाय्य, अनुदान ०६ राज्य योजनेअंतर्गत योजना (०१) (२३) महाराष्ट्र राज्य, उर्दू साहित्य अकादमीचे विविध योजनेसाठी सहायक अनुदान राज्य योजनांअंतर्गत योजना (२२३५ बी ०९४) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या खाली मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०३१२२३३८३९१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anees Iqbal Ismail Shaikh

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=447981acddcc5079f9c00eadfad2054d955a80a21de6164c4024daf5a9ea2c97, cn=Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2016.12.03 15:04:45 +05'30'

**(अनिस शेख)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ (ले.प/ले व अ.) मुंबई/ नागपूर, महाराष्ट्र राज्य,
२. अधिदान व लेखा अधिकारी मुंबई, (रोख कार्यासनामार्फत)
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
४. अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग (का-७),
५. अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, (रोखशाखा दोन प्रती)
६. कार्याध्यक्ष महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई (अकादमीच्या कार्यालयामार्फत)
७. कक्ष अधिकारी (का-७), अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (का-८), अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अधिक्षक-नि-कार्यकारीअधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.
१०. निवड नस्ती (का.८).